

# महाराष्ट्र शासन

**क्रमांक:-गौखनि-३८/०२२०/प्र.क्र.२९/ख-१**

महसूल व वन विभाग,
हुतात्मा राजगुरू चौक,मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०५ मार्च, २०२४

**विषय:- गौण खनिज- कोल्हापूर**

मौजे कोथळी ता.शिरोळ, जि.कोल्हापूर येथील गट नं. १४५ या वाळूगटाची रक्कम परत मिळण्याबाबत.

**श्री.वर्धमान जयपाल अवधूत, जि.कोल्हापूर**

**<u>शासन ज्ञापन -:</u>**

जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांना त्यांचे पत्र क्र.कार्या/६अ/आरआर/१३२१/२०१९, दि.०६/०९/२०१९ व कार्या/६अ/आरआर/१३३७/२० २१, दि.१५/११/२०२१ रोजीच्या उपरोक्त विषयावरील पत्रास अनुलक्षून असे कळविण्यात येते की, सन २०१६-१७ या वर्षाकरीता दिनांक २७/१०/२०१६ रोजी घेण्यात आलेल्या वाळूगटांच्या लिलावामध्ये मौजे कोथळी, ता.शिरोळ येथील वाळूगट क्र.१४५ मधून एकुण १४१३ ब्रास वाळूसाठ्याकरीता श्री.वर्धमान जयपाल अवधूत यांना रुपये ४०,५१,१८०/- एवढ्या सर्वोच्च बोलीस मंजूर करण्यात आला होता. जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांनी दि.७/२/२०१७ रोजीच्या आदेशान्वये वाळूगट मंजूर केला. तसेच लिलावधारकास दि.१३/२/२०१७ रोजी वाळूगटाचा प्रत्यक्ष ताबा देण्यात आला.

०२. मा.राष्ट्रीय हरित न्यायाधिकरण, नवी दिल्ली यांचे दि.१९/४/२०१७ रोजीच्या आदेशानुसार दि.२१/०४/२०१७ रोजीच्या शासन पत्रान्वये दिलेल्या सूचनांनुसार नदीपात्रातील वाळू/रेती गटातून सक्शन पंपाद्वारे होणारे वाळू उत्खनन बंद करण्यात आले. त्यामुळे लिलावधारकास उक्त वाळूगटातून दि.२२/४/२०१७ रोजीनंतर वाळूचे उत्खनन करता आले नाही.

०३. मा.राष्ट्रीय हरित न्यायाधिकरण, नवी दिल्ली यांचे दि.१९/४/२०१७ रोजीच्या आदेशानुसार दि.२१/०४/२०१७ रोजीच्या शासन पत्रान्वये दिलेल्या सूचनांनुसार नदीपात्रातील वाळू/रेती गटातून सक्शन पंपाद्वारे होणारे वाळू उत्खनन बंद करण्यात आल्यामुळे दि.२२/४/२०१७ नंतर वाळूगटातून लिलावधारकास उत्खनन न करता आलेल्या वाळूची प्रमाणशीर रक्कम रु. २८,४७,९९१/- (रुपये अठ्ठावीस लाख सत्तेचाळीस हजार नऊशे एक्यान्नव फक्त) परत करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

०४ . लिलावधारक श्री.वर्धमान जयपाल अवधूत यांनी लिलावाची रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापुर्वी ही रक्कम अदा केलेली नाही, याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर उत्खनन न करता आलेल्या वाळूची प्रमाणशीर रक्कम रु. २८,४७,९९१/- (रुपये अठ्ठावीस लाख सत्तेचाळीस हजार नऊशे एक्यान्नव फक्त) अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

**०५.** या बाबीवर होणारा खर्च सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता "०८५३-अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग" १०२-खनिजाबाबत सवलत फी व स्वामित्वधन,९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग-वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या अंदाजपत्रकीय तरतुदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

**०६.** सदर शासन ज्ञापन, वित्त विभागाच्या क्र.विअप्र-२०१९/प्र.क्र.२०/२०१९/विनियम, दि.८/८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८, भाग-२ नुसार महसूल व वन विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**०७.** सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२४०३०६१६४३३६३४१९ आहे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SHIVAJI SONAJI CHOURE

Digitally signed by SHIVAJI SONAJI CHOURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=fa37c7e079f23b78a27c84b9d6e46f94d549fc79ba170d5815f3619617b13313, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=03FE2B2D715BED4B0D90A99525AE06946672E68EA905C97DA50B34FD21223011, cn=SHIVAJI SONAJI CHOURE
Date: 2024.03.06 16:53:00 +05'30'

**( शिवाजी चौरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

जिल्हाधिकारी, कोल्हापूर

**प्रत:-**

१) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०० ०२०.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०० ०२०.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर
५) वित्त विभाग (व्यय-९/अर्थसंकल्प-३/६/१४ कार्यासने) मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६) कार्यासन अधिकारी (कार्यासन ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७) निवडनस्ती (कार्यासन “ख”), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.